प्रजासत्तेचें युग आलें. पण तेथेंहि पुनः हाच प्रश्न उद्भवल्याशिवाय राहात नाहीं. तो असा कीं, एकतंत्री राजा जाऊन त्याच्या ठिकाणीं रिपब्लिक व त्याचा लोकानियुक्त अध्यक्ष हे आले तरी सुराज्य पूर्णपणें पदरांत पडलें काय ? जेथें प्रजासत्ताक राज्य जुनें होतें किंवा नवीन झालें, तेथें तरी प्रजा सर्वस्वीं आपल्या अधिकारी मंडळावर खूष असून तिला सुराज्याबद्दल सर्टि-फिकेट देत आहे काय ? जबाबदारीचें तत्त्व अंमलांत आलें तरी ती जबाब-दारी कितपत खरोखर अंमलांत येते ? जुन्याकाळीं राजे लोकांचे हस्तक होऊन प्रधानानें जुलूम केला तर त्याचा इन्साफ करण्याचा हक्क बजावून, प्रजा प्रधानाचा शिरच्छेद करीत असे त्याप्रमाणें, आज एकातरी प्रधान-मंडळाला, निदान त्यांतल्यात्यांत एखाद्याला तरी इनसाफ करून फांशी दिल्याचें किंवा तुरुंगांत टाकल्याचें उदाहरण आहे काय ?

## ( २०७ ) जबाबदारीचें राज्य म्हटलें तरी तेंच

हल्लींच्या जबाबदारीचा अर्थ फार सौम्य व सोज्वल झालेला नाहीं काय ? सुरपाटाच्या खेळांत गडी मारला तर त्याच्या पाठींत रपाटा तरी बसतो. पदच्युत होणाऱ्या मुख्य प्रधानाला आज इतकेंहि दुःख किंवा लाज वाटत नाहीं ! " इन अँड आऊट " म्हणजे " पदारूढ व्हावें, पदच्युत व्हावें" हा नव्यायुगातल्या राजकारणात एक खेळच होऊन बसल्यासारखा झाला आहे. कारण पदच्युत झालेले प्रधान लगेच समोरच्या म्हणजे विरोधकांच्या बाकां-वर खुशाल जाऊन बसतात. आणि त्यांना मनांत असें घेऊन चालतां येतें कीं, प्रधानमंडळाची क्रान्ति हा नुसता लंबकाचा खेळ आहे. हलता लंबक एका टोंकाला गेला कीं, कांहीं काळानें तो दुसऱ्या टोंकाला जाणारच. प्रधान-मंडळांत बसलें म्हणजे ओठ आवळून, खिशांत हात घालून, गंभीर चेहरा करून, जबाबदारीच्या ओझ्यानें मान वांकून आतां मोडते असें भासवित लचकत लचकत भाषणें करावी ! आणि विरोधकांच्या बाकां-वर जाऊन बसलें म्हणजे तोंडाचा पट्टा मोकळा सोडावा, बाष्कळपणाचा हास्यविनोद करावा, तोंडाला येतील त्या कोटया प्रतिकोटया कराव्या, आणि प्रधानमंडळ एखादें वेळीं जुनेंच धोरण अमलांत आणित असतांहि "देश बुडाला, लोक बुडाले" अशी हाकाटी करावी, व्याक्तिशः कांहीं प्रसाद

खिशांत पडला तर तो घ्यावा, व एक ट्रेन चुकली तर तिच्या मागोमाग हटकून येणाऱ्या दुसऱ्या लोकल ट्रेनमध्यें उडी मारून बसण्याकरितां प्रवासी हातांत बॅग घेऊन प्लॅटफॉर्मवर उभा राहतो त्याप्रमाणें, प्रधानमंडळांत शिरण्याकरितां फिरून येणाऱ्या सुवर्णसंधीची वाट पहावी !

## (२०८) ईश्वराकडे मागण्याचा खरा वर

सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, पूर्वी एकतंत्री राजे झाले म्हणून त्यांच्यापैकीं कोणालाहि आपल्या देशाची, आपल्या लोकांची भक्ति नव्हती असें नाहीं. किंवा जुन्या काळच्या एकतंत्री राजाचा प्रधान होणारा प्रत्येक मनुष्य आपमतलबी व देशबुडव्या होता, त्याला राष्ट्राभिमान मुळींच नव्हता, असें खरोखर म्हणतां येत नाहीं. आणि आज जरी राज्यसंस्थेचें नांव बदलून तिच्या डोक्यावर डेमॉक्रसीचें 'लोकसत्ते'चे लेबल लागलें असलें तरी, जुने दुर्गुण जाऊन अध्यक्ष व प्रधानमंडळ यांच्या अंगीं कांहीं अलौकिक दिव्य गुण स्वर्गांतून उतरले आहेत असेंहि म्हणण्याचें कारण नाहीं. फरक झाला असेल तर तो इतकाच कीं पूर्वी आपल्या हातांत सत्ता नव्हती, आपल्याला राज्यकारभारांत कांहीं बोलण्याची संधि नव्हती, अशी तक्रार लोकांना यथार्थपणें करितां येत असे ती हल्लीं जाऊन "ईश्वरा चूक होणारच तर ती माझी मलाच करण्याची संधि दे" असा वर मागून घेतल्याप्रमाणें, दुसऱ्याच्या ऐवजीं लोक आपल्या चुका आपणच करूं लागले आहेत. तसें नसतें तर राज्यक्रान्ति झाल्याबरोबर, म्हणजे राजा जाऊन त्याच्या जागीं रिपब्लिकचा अध्यक्ष आल्याबरोबर, राज्यव्यवस्थेचें रूप एकदम बदलावयाला पाहिजे होतें ! पण तसें घडल्याचें कोठेंहि दिसत नाहीं. म्हणून नव्या लोकशाहीचें म्हणणें जें पटण्यासारखें आहे तें इतकेंच कीं, "होय ! चूकच कां होईना ! पण ती करण्याचें श्रेय आमचें आम्हांला मिळूं दे. चुकाच व्हावयाच्या व कुराज्य गांजणारच, तर तें आमचें आमच्या हातानें तरी घडूं दे ! तोहि एक हक्कच आहे ! आणि तो हक्क, आत्मस्वातंत्र्याचा अनुभव व जन्मसिद्ध हक्काची फलश्रुति या नात्यानें आम्ही बजावूं इच्छितों. आमच्या अंगांत कर्तृत्व असेल किंवा आमच्या नशिबीं असेल तितकें सुराज्य आमच्या पदरांत पडेल. पण उगाच जन्मभर असंतुष्ट राहून लोकांनाच नांवें

ठेवीत बसावयाचें, त्यापेक्षां आपली आपल्यालाच नांवें ठेवून घ्यावीं लागलीं तर त्यापासून मनाला कांहीं बोध तरी मिळेल. आणि उठल्या सुटल्या पर-निंदा करणाऱ्या बेजबाबदार जिभेला थोडा तरी आळा पडेल."

## ( २०९ ) जबाबदारीचा खरा अर्थ

अशा प्रकारचा प्रांजल व मर्दपणाचा युक्तिवाद जे लोकशाहीचे प्रतिनिधी व वकील करितात त्यांना मानच दिलाच पाहिजे. आणि त्यांच्या म्हणण्या-विरुद्ध कांहीं आक्षेप घेतां येण्यासारखा नाही. आपल्या कृत्याची जबाबदारी आपण घेणें म्हणजे चांगल्याबरोबर वाईट फळाचा स्वीकार करण्याची तयारी ठेवणें हीच खरी जबाबदारी. राजबंधनें पूर्वीच्या राजांच्या जुलमा-पेक्षां वेगळ्या रीतीनें व्यक्तीवर अधिकाधिक जखडून बांधलीं जाऊं लागलीं, अशा स्थितींत व्यक्तिस्वातंत्र्याचा जो विकास हल्लींच्या युगांत होत आहे, त्याला वरील प्रकारचा प्रांजल व मर्दपणाचा युक्तिवाद शोभण्यासारखा आहे. बरें, हल्लींच्या लोकसत्तेच्या काळांत विभूतिपूजा सर्वस्वीं लोपली आहे असेंहि नाहीं. जुन्या काळीं जसे विभूतिपूजेच्या बुद्धीनें लोक राजा-कडे पाहून त्याचा हुकूम मानणें यालाच, राजभक्ति किंवा राजनिष्ठा हा भावनेला गोंजारणारा शब्द लावून, मिळेल त्या सुखांत कालक्रमण करीत असत, त्याप्रमाणें आजच्या लोकसत्तेच्या काळांतहि 'डिक्टेटर' उत्पन्न होतच आहेत व लोक त्यांना भजतच आहेत. ग्रीसचा व्हेनिझेलॉस, इटलीचा मुसोलिनी, जर्मनीचा हिटलर, स्पेनचा प्रायमो डी रीव्हेरा, इंग्लंडचा ऑलिव्हर क्रॉम्वेल, फार काय पण आजहि हिंदुस्थानचे महात्मा गांधी, हे डिक्टेटर म्हणजे एका अर्थी राजापेक्षाहि मान्य होऊन राहिलेले पुढारी हे विभूतिपूजेशिवाय डिक्टेटर झाले काय ! तेव्हां मनुष्या-च्या स्वभावांतील आत्मस्वातंत्र्याची बुद्धी जितकी खरी तितकी त्याची विभूति-पूजेची भावनाहि अजून खरी आहे. या दोहोंचा खेळ अगदीं सरमिसळ चाललेला असून, मनुष्य "मी करितो तेंच बरोबर करीत आहे" असें म्हणेल, तेव्हां "होय बाबा, तेंच खरें" असें नुसतें म्हणून गप्प बसणें भाग आहे. एरवीं लोकसत्ता प्रवृत्त झाली म्हणून, त्या प्रमाणानें प्रजेचा संतोष किंवा प्रजेला मिळणारें सुराज्यसुख वाढलें असें म्हणवत नाहीं.

## ( २१० ) राज्यशास्त्रांतली नीति

असो. शेवटीं एकाच गोष्टीचा विचार करावयाचा उरला तो करून हें प्रकरण संपवूं. राजकीयदृष्ट्या समाजांतील व्यक्तीच्या वर्तनाचा विचार करावयाचा असतां त्याला नीतिशास्त्र किंवा अध्यात्मशास्त्र यांची उंची कसोटी लावितां येत नाहीं. कारण मनुष्य हा मुख्यतः स्वार्थी असतो. म्हणून त्याचें कार्याकार्य ठरवितांना त्याच्या दृष्टीनेंच बहुधा पहावें लागतें. त्याच्या या 'कर्तव्य' क्षेत्रांत अध्यात्मशास्त्रांतला परमार्थ येऊंच शकत नाहीं. निदान तो परमार्थ दृष्टीनें, धार्मिक दृष्टीनें, जें करील त्याचा संबंध समाजाच्या राजकीय व्यवस्थेशीं येत नाहीं. त्याच्या कर्तव्यक्षेत्रांत परार्थ हा मात्र येऊं शकतो. पण तोहि निवळ परोपकारबुद्धीनें नव्हे, तर स्वार्थसाधक परार्थ म्हणून. त्याचें कर्तव्य ठरवितांना एका बाजूला स्वार्थाची प्रेरक शक्ती, व दुसऱ्या बाजूला समाजांतील इतर व्यक्तींचा तशाच प्रकारचा स्वार्थ न दुखविण्याविषयीं त्याजवर असलेल्या नियंत्रणाची शक्ति, या दोन शक्तींचा छेद कोठें कसा पडतो एवढेंच पहावयाचें असतें. अध्यात्माच्या दृष्टीनें परमार्थ हें ध्येय म्हणून उल्लेखितां येतें. पण राजकीय समाजांतील मनुष्याच्या कर्तव्याचा विचार करितांना त्या ध्येयाची गरजच नसते. त्यानें आपलें कर्तव्य समाजांतील इतर लोकांच्या संबंधात निरपवाद रीतीनें केलें म्हणजे तो कृतकृत्य झाला असें म्हणावें लागतें.

## ( २११ ) चांगल्यावाईट नागरिकांच्या प्रति

भर्तृहरीनें एका सुप्रसिद्ध श्लोकांत चांगल्या वाईट मनुष्यांच्या प्रति लावून वर्णन केल्या आहेत. "एते सत्पुरुषाः परार्थघटकाः" इत्यादि हा तो श्लोक होय. त्यांत तो म्हणतो कीं "आपला फायदा टाकून देऊनहि जो लोकांचें कल्याण करतो किंवा हित साधितो त्याची प्रत पहिली. त्याला सत्पुरुष असें म्हणावें. लोकासाटीं झटणारा, पण त्याबरोबर स्वार्थ न सोडणारा, या मनुष्याची प्रत दुसरी. त्याला सामान्य म्हणावें. आपल्या फायद्यासाठीं लोकांचें नुकसान करणारा मनुष्य याची पायरी तिसरी. त्याला राक्षस असें म्हणतां येईल. पण स्वतःचा फायदा नसतांहि दुसऱ्याचें नुकसान करणाऱ्या मनुष्याची प्रत चौथी; व भर्तृहरि म्हणतो त्या मनुष्याला काय म्हणावें

हें मला समजत नाहीं !" कदाचित् त्याला राक्षसाधम असें म्हणतां येईल. पण 'राजकीय' समाजांतील मनुष्यानें पहिल्या कोटींत पडावे अशी कोणीहि अपेक्षा करीत नाहीं. आतां असे कांहीं लोक राजकीय समाजांतहि असतात कीं, ते स्वतःचें नुकसान करून समाजाचा फायदा करून देतात, व त्याकरितां लोकहि त्यांची देशभक्तांत व राजकीय सत्पुरुषांत गणना करितात हें वेगळें. पण अशा प्रकारची अलौकिक विधायक देशभक्ति करणें हें राजकीय समाजांतील मनुष्याचें 'कर्तव्य आहे !' अशी भाषा कोणी वापरीत नाहीं. कारण तशी समजूतच नाहीं. तसेंच चौथ्या प्रतीच्या म्हणजे राक्षसाधम मनुष्यालाहि राजकीय समाजाच्या नीतिशास्त्रांत स्थान नाहीं. कारण दुसऱ्याचें नुकसान केल्याबद्दल त्याला शासन होईल, व तेंहि निरर्थक केलें म्हणून कदाचित् थोडें अधिकच शासन होईल. राहतां राहिले मधले दोन वर्ग. त्यांपैकीं स्वार्थाकरितां दुसऱ्याचें नुकसान करणाऱ्या तिसऱ्या कोटींतल्या मनुष्यासंबंधानें मात्र एकदम निर्णय देतां येणार नाहीं. कारण त्यानें इतर कोणाचें नुकसान केलें हें खरें असेल, पण स्वतःचा कायदेशीर व न्यायाचा स्वार्थ साधण्याकरितां केलें असेल, आणि तो साधतांना जर आपाततः त्याच्या हातून तें नुकसान घडलें असेल, तर येथें सूक्ष्म धर्माचा विचार अर्थातच उत्पन्न होईल. कारण स्वार्थसंरक्षणाची योग्य मर्यादा कोठें संपते हें ठरलें म्हणजे मग, त्यापलीकडे गेल्यानें त्याच्या हातून इतरांचें जें नुकसान झालें असेल त्याबद्दल त्याला शासन भोगावें लागेल. त्या मर्यादेच्या आंत दुसऱ्याच्या हिताला अपाय करण्यासारखी गोष्ट त्याच्या हातून घडली तरी त्याबद्दल त्याला शासन होणार नाहीं. त्याच्यावर जें नियंत्रण समाजानें किंवा कायद्यानें घातलेलें असतें तें "कोणच्याहि स्थितींत दुसऱ्याचें नुकसान करूं नये" अशा स्वरूपाचें नसतें, तर "स्वार्थ-संरक्षणाची योग्य मर्यादा उल्लंघून त्यानें दुसऱ्याचें अनहित करूं नये" यावरच ती नियंत्रणाची मर्यादा पडते. राहतां राहिला दुसऱ्या कोटींतला 'सामान्य' म्हटलेला मनुष्य. म्हणजे जो स्वतःचा स्वार्थ न सोडतां त्यांतल्या त्यांत होईल तें लोकांचेंहि हित साधितो. अस्सल नीतिशास्त्र हें मनुष्याच्या कृत्यांचें परीक्षण हेतुमूलक दृष्टीनें करणारे असल्यामुळें, अशा दुटप्पी माणसाच्या वर्तनाला तें मोठेंसें सर्टिफिकेट देणार

नाहीं. कारण या शास्त्राच्या मतें तेंच कृत्य सत्कृत्य ठरेल, कीं ज्यांत मुळा-मध्यें निस्वार्थीपणाच आहे. नीतिशास्त्राचा कटाक्षच तसा असतो.

## (२१२) राजकीय कर्मयोगशास्त्र

पण राजकीय कर्मयोगशास्त्र हें नीतिशास्त्राइतकें कडक नाहीं. कारण तें आपले सिद्धान्त निस्वार्थीपणावर उभारीत नाहीं, तर स्वार्थ आणि परार्थ हीं दोन्ही तत्त्वें स्वीकारूनच त्यांच्या तारतम्यानें कर्माकर्मांचें सिद्धान्त तें सांगतें. तात्त्विकदृष्टया परार्थसाधन हेंच श्रेष्ठ प्रतीचें ध्येय असेल. परंतु राजकीय समाजाच्या व्यवहारांत परमावधीची शुद्ध नीति कोणती हें न पाहतां, एकासारख्या दुसऱ्या माणसानें सामान्यपणें कसें वागावें इतकेंच पाहणें असतें. या जगांत राहणाऱ्या सामान्य मनुष्याला इतर लोकांप्रमाणें स्वतःला ऐहिक समृद्धि व ऐश्वर्य प्राप्त करून घेण्याची आवश्यकता असते, व ती मिळविण्याचा नैतिक हक्कहि त्याला असतो. म्हणून राजकीय समाजांत परम साध्य कोणतें या प्रश्नाचें उत्तर "स्वार्थाबरोबर साधणारा परार्थ" हेंच होय. म्हणून शहाणा स्वार्थ, दूरदर्शी स्वार्थ, सात्त्विक स्वार्थ हा राज्य-शास्त्रांतील व्यक्तिधर्मांत ग्राह्य ठरतो. आत्मौपम्य बुद्धीनें जें आपणाला प्रिय व हितकर तेंच समाजांतील इतरांनाहि असणारच अशी बुद्धि ठेवून मनुष्य वागला तर ठीकच. त्याच्या हातून परहिताचा नाश होणार नाहीं, व राजसत्तेनें त्याला नियंत्रण घालण्याचा प्रसंग येणार नाहीं. पण त्याच्या ठिकाणीं आत्मौपम्य बुद्धि प्रगट झाली नाहीं, तरी व्यावहारिक समाज-शास्त्राच्या दृष्टीनें त्याला नांव ठेवतां येत नाहीं व सरकारला त्याला नियंत्रण घालतां येत नाहीं. फक्त त्याच्या स्वार्थ बुद्धीनें नंगा नाच घालून त्याजकडून इतरांचें नुकसान न करविलें म्हणजे झालें. " मी मेलों तरी चालेल, पण स्वार्थाकरितां मी दुसऱ्याला मारणार नाहीं " ही गीतेतल्या पहिल्या अध्या-यांतल्या अर्जुनाची उंची भाषा मनुष्यानें बोलावी, किंवा तितक्या उच्च भावनेनें वागावें, अशी समाजशास्त्राची किंवा राज्यशास्त्राची अपेक्षाच नसते. फक्त स्वहितसंरक्षण व परहितनाश याचा छेद जेथें पडतो त्याच्या पलीकडे त्यानें पाऊल टाकलें कीं नाहीं इतकेंच पाहणें असतें. " मी लोकांचा घात केला तर लोकहि माझा घात करतील " या

कल्पनेनें तो नीट वागला तरी चालेल. दुसऱ्याविषयीं प्रेम नसलें तरी स्वार्थमूलक भीतीनेंहि तो मर्यादेंत राहिला तरी काम झालें. त्याच्यावरं वेगळें नियंत्रण घालण्याचें कारण सरकारला उरत नाहीं. आणि अशा रीतीनें जो तो वागूं लागला म्हणजे, व प्रत्येकानें आपलें हित अशा निरपवाद रीतीनें साधलें म्हणजे, समाजांतील पुष्कळांचें पुष्कळ हित आपोआपच सिद्ध होण्यास मदत होते. या प्रकारें व्यक्तीचें व समाजाचें हित साधलेलें पाहणें इतकेंच राज्यशास्त्राचें कार्य आहे. अर्थात् त्याला कोणी पहिल्या प्रतीचें नीतिशास्त्र म्हणणार नाहीं. परंतु राज्यशास्त्रांत हें मर्यादित व्यावहारिक नीतिशास्त्रच पुरें असतें. आणि राष्ट्रांतील कायदे आणि राज्यसत्ता हीं हें व्यावहारिक नीतिशास्त्र पदरांत पडण्यापुरताच खटाटोप करितात.

---

# परिशिष्ट १

## भावी हिंदी स्वराज्य-घटना

या ग्रंथाच्या मुख्य भागांत केवळ तात्विक विवेचनच करण्यांत आलें आहे. त्यांत कोणत्याहि एका किंवा अनेक राष्ट्रांतील राज्यघटना किंवा राज्यकारभार यांचा तपशीलवार विचार आम्ही केला नाहीं. सामान्यपणें राज्यघटना व राज्यकारभार या विषयातल्या मुख्य पांच पंचवीस मुद्यां-पैकीं प्रत्येक मुद्यावर इंग्रजी भाषेंत पांचपांच दहादहाहि ग्रंथ आहेत. आणि प्रत्येक राष्ट्रासंबंधानें फिरून तपशीलवार विचार करणारे ग्रंथ वेगळेच. अर्थात् हे सर्व बाजूला ठेवून, व त्या दिशेचा विचार सोडून, या अवघ्या दोनशें पानांच्या ग्रंथांत सर्वसाधारण तात्त्विक विवेचन करण्यावरच आम्हाला राज्यशास्त्रनिरूपणाचें हें काम भागवून घ्यावें लागलें. तथापि खंडीभर कापूस पिंजला, पण एक हातभरहि सूत काढलें नाहीं तर त्याचा काय उपयोग ? याकरतां एखाद्या राष्ट्राच्या तरी घटनेचा तपशील द्यावा हें योग्य, म्हणून हिंदुस्थानच्या राज्यघटनेचाच तपशील थोडक्यांत याखालीं देण्याचें योजिलें आहे. पण ती घटना हल्लीं अमलांत असलेली मात्र नव्हे. कारण हल्लींची घटना कदाचित् लवकरच बदलण्याचा संभव आहे. शिवाय बदल-णारी नवी घटना ही देखील राष्ट्राला समाधानकारक ठरण्याचा संभव नाहीं. पण सुमारें तीन वर्षांपूर्वी हिंदी राष्ट्रीय सभेनें नेहरू कमिटीचा म्हणून एक रिपोर्ट मंजूर केला, त्याबरोबर तदंतर्गत घटनाहि मंजूर केली. आणि त्या-नंतर लाहोर येथें सन १९२९ सालीं प्रत्यक्ष स्वातंत्र्याचा ठराव मंजूर झाला तरी, विधायक निर्मितीच्या दृष्टीनें नेहरू-रिपोर्टांतील घटना अजून शिल्लकच आहे. तिची जागा दुसऱ्या कोण्या घटनेनें अजून घेतलेली नाहीं. म्हणून ती घटना लोकदृष्टीनें अद्यापि अबाधित आहे व स्वातंत्र्याला बरीच जवळजवळ आहे. म्हणून त्या घटनेच्या कलमांचा सारांश या खालीं दिला आहे.

---

# भावी हिंदी

## स्वराज्य–घटनेचीं कलमें

( १ ) वसाहतीच्या नमुन्याचें स्वराज्य आज खालील देशांत आहे:— कानडा, आस्ट्रेलिया, न्यूझीलंड, दक्षिण आफ्रिका, आयर्लंड. म्हणजे या प्रत्येक देशांत स्वतंत्र पार्लमेंट आहे; प्रधानमंडळ या पार्लमेंटाच्या हुकमांत वागतें. हिंदुस्थानांतहि अशाच प्रकारचें स्वराज्य असावें.

( २ ) हिंदी पार्लमेंटानें केलेले कायदे सर्व हिंदुस्थानभर अमलांत राहतील. तसेंच हिंदुस्थानालगत समुद्रावरहि कांहीं मैलांपर्यंत त्या कायद्यांचा अंमल राहिला पाहिजे. अशा रीतीनें हिंदी पार्लमेंट स्वतंत्र झालें म्हणजे विलायतेंतील पार्लमेंटानें केलेल्या कोणत्याहि कायद्याचें बंधन हिंदुस्थानावर राहणार नाहीं. हिंदुस्थानांतील कायदेमंडळांनीं केलेले कायदे जुने म्हणून यापुढें अमलांत रहावयाचे नाहींत. तथापि जुने कोणतेहि कायदे पुढेंहि अमलांत रहावे असें हिंदी पार्लमेंटाला वाटेल तर तसें ठरविण्याचा अधिकार अर्थातच त्यास राहील.

( ३ ) **हिंदी नागरिक** म्हणजे स्वतः ज्याचा, किंवा ज्याच्या बापाचा, जन्म हिंदुस्थानाच्या भूमींत झाला, किंवा तसा जन्म न झाला तरी ज्यानें कायम वस्ती करून हिंदुस्थान हा देश आपला म्हणून मानला, तो हिंदी नागरिक समजावा. परदेशाच्या एखाद्या नागरिकाला हिंदुस्थानचा नागरिक व्हावयाचें असेल तर त्यानें यापुढें 'मी त्या परदेशाचा नागरिक नाहीं' असें लिहून दिलें पाहिजे.

( ४ ) प्रत्येक हिंदी नागरिकाला खालीं लिहिलेले **मूलभूत हक्क** जन्मसिद्ध आहेत, व ते त्याला कोणी द्यावे लागत नाहींत असें समजण्यांत येईल:—

१ देशांतील जनता म्हणजे जनतेंतील सर्व व्यक्ती मिळून सर्व राज्याधिकाराचें उगमस्थान होय. राष्ट्रांतील कोणत्याहि कायद्यानें अगर अधिकारानें काम चाललें तरी मुळांत त्याला संमति किंवा परवानगी जनतेनेंच दिलेली आहे असें मानण्यांत येईल.

याचा अर्थ असा कीं, हिंदी राष्ट्र हें इतर सर्व राष्ट्रांपासून स्वतंत्र आहे, आणि राष्ट्रांतील प्रत्येक अधिकारी हा लोकतंत्र आहे. इतर कोणत्याहि

राष्ट्राची हुकमत हिंदुस्थानावर नाहीं, आणि हिंदुस्थानांतील लोकशाहीची हुकमत मात्र हिंदुस्थानांतील प्रत्येक अधिकाऱ्यावर आहे.

२ कोणाहि हिंदी नागरिकाचें स्वातंत्र्य किंवा त्याची मिळकत यांना (मुळांत कायदा असल्याशिवाय) कोणाहि अधिकाऱ्याला बंधन घालतां येणार नाहीं किंवा सरकारजमा करतां येणार नाहीं.

३ हिंदी नागरिकानें कोणत्याहि विषयावर त्याला पसंत पडेल तें मत स्वीकारावें किंवा प्रगट करावें. धार्मिक मतें किंवा आचार यांचे बाबतींतहि त्याला अशीच पूर्ण मोकळीक राहील. मात्र त्यानें आपलीं मतें किंवा आचार प्रगट करतांना सार्वजनिक शांतता किंवा संभावितपणा किंवा नीति यांचा भंग किंवा उपमर्द करूं नये.

४ मतप्रसाराकरितां किंवा आचारपालनाकरितां हिंदी नागरिकांना हवे तेवढे किंवा हवे तसे संघ बनवितां येतील. मात्र संघांनी शांतताभंग करूं नये किंवा हत्यारें वापरूं नयेत.

५ प्रत्येक हिंदी नागरिकाला सारख्याच हक्कानें प्राथमिक शिक्षण फुकट मिळालें पाहिजे. ज्या शाळांना सरकारी किंवा निमसरकारी मदत हवी असेल त्यांनीं शाळेंतील कामांत जाति, धर्म, पंथ यांचा भेद ठेवतां कामा नये.

६ सर्व हिंदी नागरिक दिवाणी कायद्यानें सारखेच मानले जातील. अमुक श्रेष्ठ म्हणून त्याला सवलत आणि अमुक कनिष्ठ म्हणून त्याला बंधन अशी गोष्ट राहणार नाहीं.

७ फौजदारी कायदाहि सर्व नागरिकांना सारखाच लागू होईल.

८ कोणतेंहि कृत्य घडलें त्या वेळीं त्या वेळच्या कायद्यानें तो गुन्हा ठरत असेल तरच तो गुन्हा. आज नवा कायदा केला तर त्यामुळें, काल किंवा त्यापूर्वी झालेलीं कृत्यें यांना गुन्हे मानतां येणार नाहीं.

९ फटक्याची शिक्षा यापुढें अमलांत राहणार नाहीं. तसेंच सरकारी शिक्षेच्या नांवाखालीं कोणाहि नागरिकाच्या शरीराचा छळ किंवा त्याला इजा केली जाणार नाहीं.

१० प्रत्यक्ष युद्ध सुरू नसेल तेव्हां कोणाहि अधिकाऱ्याला, कोणाहि नागरिकास कायदेशीर चौकशी न करतां अटकेंत ठेवतां येणार नाहीं. व

त्याला कोणी तसें अटकेंत ठेवल्यास त्याला न्यायकोर्टापुढें आणून हजर करण्याचा हुकूम वरिष्ठ कोर्टाला मागतां येईल व तो दिला जाईल.

११ कोणत्याहि एखाद्या विशिष्ट धर्मावर सरकारी पैसा खर्च केला जाणार नाहीं. हिंदी राष्ट्राचें सरकार स्वतःचें म्हणून कोणतेंहि धर्मखातें ठेवणार नाहीं. तसेंच कोणी अमुक एका धर्माचा म्हणून त्याला अधिक हक्क किंवा सवलत आणि कोणी इतर धर्माचा म्हणून त्याला कमी हक्क किंवा सवलत असें होणार नाहीं.

१२ जी शाळा सरकारी मदत घेईल तिनें विद्यार्थ्यांना कोणत्याहि एका विशिष्ट धर्माचें शिक्षण प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें देऊं नये. किंवा तें घेण्यासाठीं विद्यार्थ्यांवर सक्ती करूं नये.

१३ पगार, अधिकार किंवा सन्मान मिळणारी सरकारी जागा किंवा हुद्दा, किंवा परवानगीनें चालणारा कोणताहि धंदा किंवा व्यापार, यांच्या बाबतींत प्रत्येक धर्माच्या किंवा पंथाच्या लोकाना सर्वस्वी समान हक्क राहतील.

१४ रस्ते, विहिरी, पाणवठे, धर्मशाळा अशा सार्वजनिक उपभोगाच्या जागेचा किंवा इमारतींचा उपयोग करण्याचा हक्क प्रत्येक नागरिकाला सारखाच राहील.

१५ आपापल्या धंद्यांतील किंवा व्यवहारांतील हितसंबंध दृढ व बळकट करण्याकरितां, किंवा आपली आर्थिक स्थिति सुधारण्याकरितां, नागरिकांनीं निरनिराळे संघ बनविले तर त्याला हरकत नाहीं. तसेंच कोणी कोणाला करारानें बांधून घेतलें एवढ्यामुळें, अशा संघांत सामील होण्याचा कोणाहि नागरिकाचा हक्क गमावला गेला किंवा नाहींसा झाला, असें समजण्यांत येणार नाहीं. असलीं कृत्रिम बंधनें बेकायदेशीर समजलीं जातील.

१६ कोणी कोणाशीं नोकरीचा करार केला असला तरी तो करार इच्छेला आल्यास मोडण्याचा हक्क कोणाहि नागरिकाला राहील. आतां करार मोडल्यामुळें होणारी दुसऱ्याची नुकसानी दिवाणी न्यायकोर्टानें भरून देण्याचा हुकूम केला तर अर्थातच करार मोडणाराला ती नुकसानी भरून द्यावी लागेल. पण नोकरीचा करार मोडणें हा पूर्वींप्रमाणें यापुढें फौजदारी गुन्हा होणार नाहीं.

१७ जनतेच्या हिताच्या दृष्टीनें हिंदी पार्लमेंट खालीं लिहिलेल्या गोष्टी-करितां योग्य ते कायदे करील. त्या गोष्टी अशा:—

नागरिकांचें आरोग्य राहावें. आपल्या श्रमानें उपजीविका करण्याची पात्रता त्यांच्या अंगीं राहावी. काम करण्याची ज्याची तयारी असेल त्याला काम मिळावें. व कोणतेंहि काम दिलें तरी त्याकरितां त्याला निदान गरिबीनें गुजरा होईल, अन्नवस्त्र मिळेल, इतकी मजुरी कमींत कमी मिळावी. कामकरी स्त्रिया प्रसूत होतील तेव्हां, त्याआधीं व त्यानंतर कांहीं दिवस त्यांना काम न करतांहि घरबैठी भाकरी मिळावी. कामकरी आईबापांचीं लहान मुलें किंवा बेकार, दुबळे, पंगू, म्हातारे–कोतारे लोक यांना घरबैठी भाकरी मिळावी. शेतकऱ्यांकडे त्यांच्या जमिनी कायम राहाव्या.

१८ प्रत्येक नागरिकाला हत्यारें वापरण्याचा हक्क आहे. मात्र याविषयीं जे कायदे पार्लमेंट करील त्यांना धरूनच तीं वापरलीं पाहिजेत.

१९ नागरिक या नात्यानें स्त्रिया व पुरुष दोघांचेहि हक्क सर्व बाबतींत सारखेच राहातील.

## हिंदी पार्लमेंट

( ५ ) विलायतेचा राजा म्हणजे हिंदुस्थानाचा बादशहा, सेनेट सभा, प्रतिनिधी सभा ( छोटी सभा ) इतक्यांचें मिळून हिंदी पार्लमेंट होईल. हिंदी स्वराज्यासंबंधीं कोणताहि कायदा करण्याचा अधिकार या पार्लमेंट-च्याच हातीं राहील.

( ६ ) हिंदुस्थानाकरितां राजानें आपला एक प्रतिनिधि म्हणून नेमावा. तो गव्हर्नर–जनरल. राजा त्याला जे अधिकार जीं कामें नेमून देईल तीं त्यानें करावीं. पण तीं करतांना स्वराज्याच्या घटनेचा कोणताहि नियम त्यानें मोडतां कामा नये. त्याची नेमणूक किती वर्षांची असावी हें राजानें ठरवावें.

( ७ ) ( अ ) गव्हर्नर–जनरलला योग्य तो पगार ठरविण्यांत येईल व तो हिंदुस्थानाच्या खजिन्यांतून राजाच्या नांवें खर्च पडून गव्हर्नर जन-रलास देण्यांत येईल.

( आ ) कोणत्याहि गव्हर्नर-जनरलाच्या नेमणुकीच्या ठराविक मुदतीच्या दरम्यान त्याच्या पगाराची रक्कम कमी करण्यांत येणार नाहीं.

( ८ ) ' सिनेट ' सभेचे सभासद २०० असावेत. त्यांची निवडणूक प्रांतिक कायदेमंडळांनीं करावी. प्रत्येक कायदेमंडळाला प्रांतांतील लोकसंख्येच्या प्रमाणानें जागा देण्यांत याव्या. मतें फुकट न जातां सर्व वर्गाला आपले प्रतिनिधी हिस्सेरशीनें हटकून निवडून देतां येतील अशा एखाद्या सुधारलेल्या व अनुभविक निवडणुकीची पद्धत स्वीकारली जाईल.

( ९ ) ' प्रतिनिधि ' सभेचे सभासद ५०० असावेत. व या निवडणुकीकरितां मतदारसंघ कसे बनवावेत हें स्वतः पार्लमेंटानेंच कायदा करून ठरवावें. मात्र हे संघ बनवितांना अशी खबरदारी घेतली जावी कीं स्त्री असो वा पुरुष असो, कोणीही २१ वर्षे वयाचा झाल्यावर त्याला निवडणुकींत मत देण्याचा अधिकार जन्मसिद्ध हक्कानेंच प्राप्त होईल. विशेष कारणांकरितां कोणाचा हा अधिकार काढून घेणें योग्य वाटेल तर कायद्यांतच तशी तजवीज करतां येईल. या सभांच्या सभासदांची संख्या वाढविणें झाल्यास तो अधिकार पार्लमेंटाला राहील.

( १० ) एकदां निवडलेल्या प्रतिनिधी-सभेची मुदत ( पहिली बैठक झाल्यापासून ) ५ वर्षांची राहील. सेनेट सभेची मुदत ७ वर्षे राहील. मात्र या मुदती वाढविणें किंवा मुदत भरण्यापूर्वी सभा बरखास्त करणें या गोष्टी गव्हर्नर-जनरल याला, विशेषच कारण असेल तर, करतां येतील. पण सभा अस्तित्वांतच नाहीं अशी गोष्ट ६ महिन्यांपेक्षां अधिक चालणार नाहीं. या मुदतींत नवी सभा भरविलीच पाहिजे. सभा कोठें भरवाव्या केव्हां भरवाव्या हें ठरविण्याचा अधिकार गव्हर्नरजनरल याचा. पण सभा भरली असतां त्या दिवसापुरती ती तहकूब करण्याचा अधिकार अध्यक्षाचा. सभेंतील कामाचा निकाल हल्लींप्रमाणें बहुमतानेंच लागावयाचा आहे. एखाद्या सभेचे एक अगर अधिक सभासद कोणतेहि कारणानें कमी झाले असले आणि त्यांची जागा नवी निवडणूक होऊन भरून निघाली नसली, तरी त्याकरितां सभा बंद राहूं शकत नाहीं.

( ११ ) सेनेट व प्रतिनिधि सभेला एक अध्यक्ष व एक उपाध्यक्ष असावा. दोघांचीहि नेमणूक निवडणुकीनें व्हावी. अध्यक्ष व उपाध्यक्ष हे

मुळांत मतदारसंघाकडून निवडून आलेले असे म्हणजे त्या त्या सभेचे सभासदच असले पाहिजेत.

( १२ ) अध्यक्ष, सभासद वगैरेंना सामान्य हक्क व विशेष हक्क कोणते असावेत, त्यांना कोणत्या गोष्टींत माफी असावी अगर सवलती असाव्यात, या गोष्टी पार्लमेंट कायद्यानें ठरवील.

( १३ ) जीं कामें प्रांतिक कायदेमंडळाला तोडून दिलीं नसतील त्या सर्व कामासंबंधानें सुराज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें पार्लमेंट वेळोवेळीं हवे तसे कायदे करील. हिंदुस्थानांत राहणारे किंवा हिंदुस्थानाबाहेरहि तात्पुरते राहाणारे हिंदी नागरिक किंवा सरकारी अधिकारी किंवा नोकर यांच्या वर्तनासंबंधानें कायदे करण्याचा अधिकार हिंदी पार्लमेंटाला राहील. फक्त ब्रिटिश पार्लमेंटाचा लष्करी कायदा सांभाळूनच हे कायदे हिंदी पार्लमेंटाला करतां येतील.

( १४ ) परराष्ट्रांशीं व्यवहार करण्याचे जे जे अधिकार कोणत्याहि वसाहतसरकारला आहेत तेच हिंदी पार्लमेंटाला राहातील. मात्र हिंदी संस्थानांशीं हिंदी पार्लमेंटाचा संबंध कसा राहावा याचा विचार स्वतंत्रपणें व्हावा.

( १५ ) वरिष्ठ कायदेमंडळाचें एकंदर कामकाज कसें चालावें याविषयीं सरकार तपशीलवार नियम करील. मात्र ते नियम तत्त्वतः पार्लमेंटाच्या कायद्याला धरूनच असले पाहिजेत.

( १६ ) सरकारी कामकाज चालण्याकरितां नोकर ठेवावे लागतील. त्यांच्या वार्षिक पगाराच्या रकमेचा अंदाज करून, सरकारी उत्पन्नांतून ती रक्कम मिळण्याकरितां स्वतः प्रधानमंडळानें पार्लमेंटापुढें बिल आणावें. हीं बिलें याच विशिष्ट कामाचीं, म्हणून त्यामध्यें राज्यकारभाराच्या इतर गोष्टींचा संबंध आणूं नये. तसेंच अमुक एक कर बसविण्याकरितां म्हणून सरकार बिल पुढें आणील त्यांतहि इतर गोष्टींचा संबंध आणूं नये. पैशाच्या व्यवहारासंबंधाची अगर कर बसविण्याबद्दलचीं बिलें प्रधानमंडळाखेरीज इतर म्हणजे खासगी सभासदांना पुढें मांडतां येणार नाहींत.

( १७ ) कर कोणते बसवावे, किती बसवावे, कसे वसूल करावे, कोणत्या सवलती द्याव्या, कोणाला किती माफी द्यावी, सरकारी कर्ज कसें उभारावें, कसें फेडावें या सर्व बाबींसंबंधानें कसलाहि किरकोळ किंवा तपशीलवार मुद्दा असला तरी त्याला वर कलम १६ मध्यें सांगितलेले निर्बंध लागू होतात

( १८ ) पैशाअडक्याचा व्यवहार व कराची योजना या संबंधाचीं बिलें फक्त प्रतिनिधिसभेपुढेंच आणतां येतील. आणि कोणत्याहि बिलाचें स्वरूप काय, म्हणजे त्याला वरील निर्बंध लागावे कीं नाहीं, हें ठरविण्याचा अधिकार त्या सभेच्या अध्यक्षाला राहील.

( १९ ) वरील प्रकारचें कोणतेंहि बिल प्रतिनिधिसभेनें मंजूर केल्यानंतर तें सेनेट सभेपुढें ठेवण्यांत येईल. पण या अशा बिलासंबंधानें सेनेट सभा जे ठराव करील त्यांना केवळ सूचना किंवा शिफारसी याहून अधिक मातब्बरी राहणार नाहीं. या सूचना व शिफारसी विचारांत घ्याव्या किंवा न घ्याव्या किंवा कितपत घ्याव्या हें ठरविण्याचा अखेरचा अधिकार प्रतिनिधिसभेला राहील व तिनें अखेर मंजूर केलेल्या कायद्याप्रमाणेंच अंमल होईल.

( २० ) पैशाचा व्यवहार व करयोजना या बाबी वगळल्या असतां बाकी कोणत्याहि विषयासंबंधीं कायद्याचें बिल दोहोंपैकीं कोणत्याहि सभेंत प्रथम आणतां येईल. पण तिनें तें मंजूर केलें तरी, उरलेल्या दुसऱ्या सभेनेंहि तें पसंत केलें तरच त्याला कायद्याचें स्वरूप येईल. दोनहि सभांनीं शब्दशः अक्षरशः एकमतानें मंजूर केलेल्या बिलालाच कायद्याचें स्वरूप येईल; इतराना येणार नाहीं. दोनहि सभांमध्यें मतभेद झाला तर दोनहि सभांची मिळून सभा भरवून वादग्रस्त बाबींचा विचार करण्यांत येईल. अशा संयुक्त सभेंत दोनहि सभांच्या सभासदांना सारखेच हक्क राहतील.

( २१ ) वरीलप्रमाणें कोणत्याहि बिलाला अखेर दोनहि सभांची, वेगवेगळी किंवा एकत्र, संमति मिळाल्यावर तें बिल गव्हर्नर–जनरलाकडे जाईल. तेव्हां त्यानें राजाच्या नांवानें अशा बिलाला मंजुरी द्यावी, किंवा नापसंत असल्यास संमति देऊं नये, किंवा स्वतः संमति न देतां " राजेसाहेबांना योग्य दिसेल तसें ते स्वतः करतील " असें म्हणून तें बिल वर पाठवावें. तसेंच बिलाला स्वतःची संमति न देतां किंवा तें वर राजाकडे न पाठवितां, स्वतःलाच योग्य वाटतील त्या सूचना करून त्यांसह तें बिल पार्लमेंटाकडे फेरविचाराकरितां पाठवावें. तसें घडल्यास पार्लमेंटसभेनें योग्य तो विचार करून, आणि बिल दुरुस्त करून किंवा न करतां, योग्य वाटेल त्याप्रमाणें तें बिल फिरून पूर्वीप्रमाणें अखेर संमतीकरितां गव्हर्नर–जनरला-

कडे पाठवावें. मात्र गव्हर्नर–जनरल किंवा राजेसाहेब यांची अखेर संमति मिळाल्याशिवाय कोणत्याहि बिलाला कायद्याचें स्वरूप येणार नाहीं.

## वरिष्ट प्रधानमंडळ.

( २२ ) राज्यकारभाराची मुख्य सत्ता राजाकडे राहाते अशी समजूत आहे. पण ही निवळ समजूतच होय. कारण राजाचा प्रतिनिधि म्हणून गव्हर्नर–जनरल यानेंच राजाचे सर्व अधिकार प्रत्यक्ष बजावावयाचे असतात. तथापि हे अधिकार व्यक्तिशः त्यालाहि एकट्याला नाहींत. त्याला सल्ला देण्याकरितां जबाबदार असें एक प्रधानमंडळ नेहमीं असलें पाहिजे. या प्रधानमंडळांत एक मुख्य प्रधान व सहा उपप्रधान अशी संख्या तूर्त ठरविण्यांत यावी. मुख्य प्रधान नेमावयाचा तो गव्हर्नर जनरल यानें आपल्या पसंतीप्रमाणें नेमावा. पण सहा दुय्यम सहकारी उपप्रधान किंवा कारभारी कोण असावे हें मुख्य प्रधानानें आपल्या मर्जीप्रमाणें ठरवावें; व त्यांचीच नेमणूक गव्हर्नर–जनरलानें केली पाहिजे. प्रधानमंडळांत अनेक लोक असले, व सोयीकरितां प्रत्येकाकडे वेगवेगळें काम खातेवारीनें नेमून दिलें असलें, तरी कोणत्याहि खात्यासंबंधानें वाद उत्पन्न झाल्यास, सर्व प्रधानमंडळानें मिळूनच बऱ्यावाईट कारभाराची जबाबदारी घेतली पाहिजे.

( २३ ) प्रधानापेक्षां खालच्या सर्व दर्जांचे अधिकारी हे गव्हर्नर जनरलानें किंवा त्यानें हा अधिकार दिलेल्या खालच्या अधिकाऱ्यानें किंवा पार्लेमेंटाचा कायदा ठरवून देईल त्यांन नेमावें.

( २४ ) लष्कर, आरमार, विमानी फौज या सर्वांचा मुख्य अधिकार गव्हर्नर–जनरल याजकडे राहील. कारण तो अधिकार मुळांत राजाचाच आहे.

( २५ ) कोणत्याहि देशांत आपल्यातर्फे कोण किती वकील किंवा गुमास्ते नेमावेत, त्यांना पगार किती द्यावा, त्यांजकडे कामें काय असावीं हें सर्व हिंदुस्थानसरकारनें ठरवावें.

( २६ ) एकंदर सरकारी हिशेब–खात्यावर ऑडिटर–जनरल ( सरहिशेबनवीस ) नांवाचा मुख्याधिकारी नेमावयाचा तो हिं० सरकारनें नेमावा.

( २७ ) वर हिं० सरकारच्या नोकरींत किंवा खालीं प्रांतिक सरकारच्या नोकरांत कोणकोणते नोकर किती पगाराचे असावे हें, सरकार एकदां ठरवून देईल. त्यानंतर अशा नोकरांच्या जागा वाढविणें, कमी करणें, किंवा पगारामध्यें कमजास्त करणें या गोष्टी या कामीं अधिकार दिलेल्या फडणविशी अधिकाऱ्याच्या संमतीशिवाय कोणासहि करतां येणार नाहींत.

## प्रांतिक कायदेमंडळें

( २८ ) प्रत्येक प्रांतापुरंता कायदे करण्याचा अधिकार स्वतः राजेसाहेब आणि त्या प्रांताचें कायदेमंडळ यांजकडे राहील.

( २९ ) सर्व हिंदुस्थानाकरितां जसा गव्हर्नर-जनरल तसाच प्रत्येक प्रांताकरितां एक गव्हर्नर आपला खास प्रतिनिधि म्हणून राजानें नेमून द्यावा.

( ३० ) प्रांतिक गव्हर्नराचा पगार ठराविक असावा व तो ठरविण्याचा अधिकार हिंदी पार्लमेंटाला राहील.

( ३१ ) प्रांतिक कायदेमंडळाकरितां प्रतिनिधी सभासदांची संख्या नियमित असावी. म्हणजे दर लाख लोकसंख्येला एक सभासद अशी असावी. एखाद्या प्रांताची लोकसंख्या शंभर लक्षाहून कमी असल्यास, त्या प्रांताच्या कायदेमंडळांत संख्येच्या प्रमाणाबाहेर पण जास्तींत जास्त शंभरापावेतों सभासद असल्यास हरकत नाहीं.

प्रत्येक सभासद ठराविक मतदारसंघाकडून निवडून आला असला पाहिजे. ( सरकारी नेमणुकीचे सभासद मुळींच नसावे. ) या निवडणुकीकरिता योग्य दिसेल त्याप्रमाणें मतदारसंघ बनवावे. कोणत्याहि मतदारसंघाच्या आवारांतील २१ वर्षांवरचा कोणीहि, मग ती स्त्री असो वा तो पुरुष असो, मतदारसंघाच्या यादींतून वगळला जातां कामा नये. कोणत्या विशेष दोषाकरितां मतदारीचा हक्क मनुष्याला राहूं नये हें कायद्यानें कायमचें ठरविलें जावें. हा दोष ज्यांच्या ठिकाणीं नाहीं त्या प्रत्येक मनुष्याला मतदारीचा हक्क असला पाहिजे.

( ३२ ) प्रांतिक कायदेमंडळाची मुदत सामान्यतः त्याच्या पहिल्या बैठकीच्या तारखेपासून पांच वर्षांची असावी. तथापि ही मुदत प्रसंगाविशेषीं योग्य कारणाकरितां वाढविणें, कमी करणें, मुदतीच्या आधीं कायदेमंडळ

बरखास्त करणें, त्याच्या सभांच्या जागा व दिवस नेमून देणें, इत्यादि अधिकार गव्हर्नरला राहातील. तथापि का० मंडळ बरखास्त झाल्यापासून सहा महिन्यांच्या आंत नवीन कायदेमंडळ बनविण्यांत आलेंच पाहिजे. मंडळाचे कोणतेहि निर्णय त्यांतील बहुमतानेंच होतील. कोणी एक किंवा अनेक सभासदांची जागा रिकामी आहे, एवढ्यानें मंडळाचें कोणतेंहि काम थांबणार नाहीं. सभा चालू असतां एखाद्या दिवशीं सभेचें काम थांबवून तें पुढच्या दिवसावर ढकलण्याचा अधिकार अध्यक्षाला राहील.

( ३३ ) प्रां. कायदेमंडळाचा अध्यक्ष व उपाध्यक्ष हे दोघेहि मंडळानें आपल्याच सभासदांमधून निवडले पाहिजेत.

( ३४ ) प्रांतिक कारभाराचे विषय कोणते हें हिंदी पार्लमेंट ठरवून देईल. तें ठरवून दिल्यावर मग त्या सर्व विषयांसंबंधानें सुराज्यव्यवस्थेकरित हवे ते कायदे आपल्या पसंतीप्रमाणें प्रां. कायदेमंडळाला करण्याचा अधिकार आहे.

( ३५ ) अशा ‘ प्रांतिक ’ म्हणून ठरलेल्या विषयासंबंधानें पूर्वींचे जे कायदे असतील किंवा पुढें होतील ते आपल्या मर्जीप्रमाणें बदलण्याचा अधिकार प्रां. का मंडळाला राहील.

( ३६ ) सरकारी पैशाच्या व्यवहारासंबंधानें, म्हणजे महसूल व खर्च या संबंधानें, कोणताहि कायदा करावयाचा झाला तर त्याचें बिल पुढें आणण्याचा अधिकार प्रांतांकरितां ( खालीं दिल्याप्रमाणें ) नेमलेल्या प्रधान–मंडळालाच राहील. खासगी सभासदांना तो अधिकार नाहीं.

( ३७ ) प्रां. प्रधानमंडळानें एखादा कायदा मंजूर केला तर तो आपल्याला पसंत आहे किंवा नापसंत आहे हें गव्हर्नर जाहीर करील.

( ३८ ) तो कायदा गव्हर्नरला नापसंत असेल तर त्याचा अंमल होऊं शकणार नाहीं.

( ३९ ) तो कायदा गव्हर्नरला पसंत असला तरी त्याची एक प्रत गव्हर्नर–जनरलाकडे पाठविली पाहिजे. आणि वर गव्हर्नर–जनरलाचीहि संमति मिळेल तरच तो कायदा अमलांत येईल.

( ४० ) मात्र गव्हर्नर–जनरलानें आपल्या नापसंतीचीं कारणें लेखी जाहीर केलीं पाहिजेत.

( ४१-४२ ) गव्हर्नर-जनरलानें प्रां. कायद्याला संमति दिली तरी देखील, खुद्द राजेसाहेबांना तो कायदा नापसंत असल्यास तो कायदा फुकट जाईल व त्याचा अंमल होणार नाहीं.

## प्रांतिक प्रधानमंडळ

( ४३ ) प्रांताचा सर्व कारभार गव्हर्नराच्या हातीं. मात्र त्याला सल्ला देण्याकरितां एक प्रांतिक प्रधानमंडळ राहील.

( ४४ ) प्रत्येक प्रांताकरितां पांच सभासदांचें एक प्रधानमंडळ राहील. हे सभासद गव्हर्नरानें नेमावयाचे आहेत.

( ४५ ) परंतु मुख्य प्रधान हाच तेवढा गव्हर्नरानें आपल्या पसंती-प्रमाणें नेमावा, व हा मुख्य प्रधान जे बाकीचे चार पसंत करील त्यांचीच नेमणुक गव्हर्नरानें केली पाहिजे.

## वरिष्ठ न्याय-कोर्ट व हायकोर्टें

( ४६ ) स्वराज्यस्थापनेनंतर एक मुख्य न्यायाधीश व इतर कांहीं दुय्यम न्यायाधीश मिळून एक वरिष्ठ न्यायकोर्ट हिंदी पार्लमेंटाकडून निर्माण कर-ण्यांत येईल.

( ४७ ) या न्यायकोर्टाच्या अध्यक्षाची व इतर न्यायाधिशांची नेमणुक हिंदुस्थानसरकाराकडून होईल, त्याचा पगारहि तेंच सरकार ठरवील. मात्र कोणाहि न्यायाधिशाचा जो पगार नेमणुकीच्या वेळीं ठरेल तोच पगार तो तें काम सोडून देईपर्यंत चालू राहील, कमी करण्यांत येणार नाहीं.

( ४८ ) हा सरन्यायाधीश किंवा इतर न्यायाधीश यांपैकीं कोणी आप-ल्या कामाला नालायक आहे असें वाटेल तर पार्लमेंटाच्या दोनही मंडळींनीं एकाच वेळीं तसा ठराव मंजूर केल्यास ती विनंति मान्य करून हिंदुस्थान-सरकार त्या न्यायाधिशाला कामावरून दूर करूं शकेल.

( ४९ ) या वरिष्ठ न्यायकोर्टाकडे मुख्य कामें खालीलप्रमाणें सोंपवि-ण्यांत येतील:—

१ हिं. सरकार व हिं. संस्थानिक यांच्या दरम्यान तह करार वगैरे-संबंधीं उत्पन्न झालेले अखेर वादाचे प्रश्न.

२ हिं. सरकारच्या तर्फे किंवा हिं. सरकाराविरुद्ध मांडण्यांत येणारे दावे.

३ परदेशच्या वकिलातीसंबंधाचे दावे.

४ हिंदुस्थानांतील एक प्रांत व दुसरा प्रांत यांच्या दरम्यान उत्पन्न होणारे अखेरचे दावे.

५ स्वराज्यघटनेच्या कायद्यासंबंधाचा म्हणजे त्याच्या अर्थासंबंधाचा कोणताहि प्रश्न.

( ५० ) तसेंच वरिष्ठ कोर्टाच्या सामान्य न्यायाधिशाच्या अव्वल निकालावरील अपिलें. पूर्वी प्रांतिक हायकोर्टाचे ठरावावर खुद्द राजेसाहेब ( प्रिव्ही कौन्सिल ) यांजकडे होणारीं अपिलें, यांपैकीं पार्लमेंटाच्या नियमाप्रमाणें जीं वरिष्ठ न्यायकोर्टाकडे सोंपविलीं असतील त्यांची सुनावणी करवून त्यांचा निकाल करण्याचा अधिकारहि या वरिष्ठ कोर्टाकडे राहील.

( ५१ ) या वरिष्ठ कोर्टाच्या निकालावर कोणाकडेहि अपील करतां येणार नाहीं. तोच निकाल अखेरचा मानला जाईल.

( ५२ ) या उप्पर स्वतः वरिष्ठ कोर्टानेंच जर असें ठरविलें कीं 'आमच्या कांहीं प्रकारांच्या ठरावावर राजेसाहेब व त्यांचें (प्रिव्ही) कौन्सिल यांजकडे अपील जाण्यास हरकत नाहीं' तर तसलीं अपिलें प्रिव्ही कौन्सिलकडे जाऊं शकतील, मात्र वरिष्ठ कोर्टानें कोणत्याहि दाव्यांत तसें लेखी सर्टिफिकीट दिलें पाहिजे. याशिवाय स्वतः राजेसाहेबांनाच केव्हां वाटलें कीं, आपण एकादे अपील विशेष कारणाकरितां घ्यावें व सुनवावें तर त्यांना तो अधिकार अर्थातच राहील.

( ५३–५४ ) याशिवाय प्रत्येक प्रांताकरितां खास असें एकेक हायकोर्ट राहीलच. यांत एक मुख्य न्यायाधीश राहील व इतर न्यायाधीश जास्तींत जास्त एकोणिसापर्यंत राहतील. या सर्वांची नेमणूक हिंदुस्थानसरकार करील.

( ५५ ) कोणत्याहि हायकोर्टाकरितां न्यायाधीश नेमावयाचा तो त्या कोर्टांत दहा वर्षांहून अधिक काम केलेल्या ॲडव्होकेट ( वकील ) वर्गांतूनच नेमला पाहिजे.

( ५६–५८ ) गव्हर्नर–जनरलशिवाय दुसरा कोणीहि हायकोर्टाच्या

न्यायाधिशांना कामावरून काढूं शकत नाहीं. मात्र प्रांतिक कायदेमंडळानें या कामीं मुद्दाम ठराव करून त्याला काढून टाकण्याची विनंति आधीं गव्हर्नरला प्रथम केली पाहिजे. तसेच न्यायाधिशांचे पगार, रजा, पेन्शन यासंबंधाचे नियम गव्हर्नर–जनरलच करील.

( ५९ ) मुख्य किंवा इतर एखादा न्यायाधीश एकदम रजेवर गेल्यास, गव्हर्नर–जनरल हा त्यांच्या जागीं दुसऱ्या कोणाची नेमणूक करीपर्यंत, प्रांतिक सरकारला त्या जागीं तात्पुरती किंवा हंगामी नेमणूक करण्याचा अधिकार आहे.

(६०–६२) या हायकोर्टांना हल्लींच्या हायकोर्टांकडे चालू असणारे सर्व मामुली अधिकार राहतील व त्याकरितां सनद देण्यात येईल.

( ६३ ) विशेष कारणाकरितां एखाद्या हायकोर्टाचा अधिकार किंवा क्षेत्रमर्यादा वाढवावी असें गव्हर्नर–जनरल यास योग्य वाटेल तर त्याला तसें करतां येईल.

( ६४ ) गव्हर्नर–जनरल, गव्हर्नर, सरन्यायाधीश, इतर न्यायाधीश, वरिष्ठ किंवा प्रांतिक प्रधानमंडळांचे सभासद यांनीं सरकारी रीतीनें आपल्या अधिकारांत केलेल्या कोणत्याहि कृत्याबद्दल त्यांच्या कोणत्याहि कोर्टाकडे फिर्याद ( दिवाणी किंवा फौजदारी ) करतां येणार नाही.

( ६५ ) विशेष कारणाकरितां जादा हायकोर्ट निर्माण करणें योग्य वाटेल तर तें निर्माण करण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलास राहील.

( ६६ ) प्रत्येक प्रांताला एक ॲडव्होकेट–जनरल ( सरकारी बॅरिस्टर) नेमण्यांत येईल.

( ६७ ) हिंदी स्वराज्यांत एकंदर सरकारी मिळकतीचा, नांवाचा धनी गव्हर्नर–जनरल–इन–कौन्सिल हा राहील. व आजवर राजा बादशहा स्टेट–सेक्रेटरी यांच्या नांवें जे हक्क नोंदलें गेलें असतील तेहि त्यांच्याकडेच येतील.

( ६८ ) हिंदी स्वराज्यांतील उत्पन्नाचा कोणताहि पैसा त्याच्याच कार्याकडे खर्च झाला पाहिजे. इतर कामाकडे खर्च होतां कामा नये.

( ६९ ) या उत्पन्नांत स्वराज्याच्या मालकींतील सर्व प्रकारचा महसूल, नजराणे, दंड, सरकारजमा होणारी बेवारशीं मिळकत वगैरे सर्व प्रकारची मिळकत येते असें मानलें जाईल.

( ७० ) रेल्वे, टपाल, बंदर याबाबत होणाऱ्या महसुलाचा एक स्वतंत्र फंड म्हणून केला जाईल व त्यांतील पैसा त्याच कामाकडे खर्च केला जाईल. इतर संकीर्ण महसुलाचाहि असाच एक निधी समजला जाऊन, त्यांतून खर्च फक्त स्वराज्यसरकाराच्या कामाकडेच होईल.

( ७१ ) खर्चाच्या बाजूला खालील कलमें मुख्यतः असतील. ईस्ट इंडिया कंपनीनें केलेलें कर्ज. १८५८ नंतर हिंदुस्थानसरकारनें केलेलें कर्ज. व नवीन स्वराज्याच्या कायद्यानें होणारें कर्ज व खर्च.

( ७२ ) स्वराज्याचें पार्लमेंट स्थापन झाल्याबरोबर सरकारनें कमिशन नेमून खालील गोष्टींची चौकशी व निर्णय करावा. ( १ ) एकंदर उत्पन्नांतून वरिष्ट सरकारला व प्रांतिक सरकारांना तोडून देण्याचा हिस्सा. ( २ ) नित्य–नैमित्तिक आर्थिक संबंधाचा वाद निघाला तर तो तोडण्याची व्यवस्था. ( ३ ) लष्करी, नाविक, व वैमानिक शिक्षण देण्याकरितां संस्था काढून व इतर रीतींनीं करण्याची व्यवस्था. ( ४ ) देशांत सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण सुरू करणें व मागसलेल्यांना विशेष सवलती देणें.

( ७३ ) या कमिशनाचा रिपोर्ट आपल्या शिफारसीसह गव्हर्नर-जनरल इन–कौन्सिल यांनीं तजविजीकरितां हिंदुस्थानाचें पार्लमेंटपुढें ठेवावा.

( ७४ ) जमाखर्च, उत्पन्न, कर्ज या संबंधानें नवा कायदा होईपर्यंत जुने कायदे अमलांत राहतील.

( ७५ ) हिंदुस्थानाचें संरक्षण करण्याकरितां गव्हर्नर–जनरल–इन्–कौन्सिल यांनीं एक ‘ संरक्षण मंडळ ’ कायमचें नेमावें. मुख्य प्रधान, लष्करमंत्री, परराष्ट्रीय मंत्री, सेनापति, नाविक व वैमानिक दळाचे अधिपति, लष्करव्यवस्थेचे मुख्य कामगार हे त्यांत सभासद असावेत. या कमिटीनें स्वराज्यसरकारला या निरनिराळ्या खात्यासंबंधानें सल्लामसलत द्यावी. व कायम खर्च किती ठेवावा, खर्चवाढ कमी कशी करावी वगैरे गोष्टीविषयीं सल्ला द्यावा.

( ७६ ) हा सल्ला घेऊन गव्हर्नर–जनरल अंदाजपत्रक तयार करतील तें पार्लमेंटामधील लोकसभेपुढें मंजुरीकरितां ठेवावें.

( ७७ ) प्रसंगविशेषीं कारण पडल्यास गव्हर्नर–जनरल यांनीं लष्करी खर्च जरूरीपुरता करावा. परंतु त्याची वर्दी ताबडतोब कायदेमंडळाला

द्यावी. या मंडळाची सभा सुरू असली तर उत्तमच. पण नसली तर ती ताबडतोब बोलवावी.

( ७८ ) लष्कर, विमानें, आरमार या खात्यांतील नोकरासंबंधानें शिस्तीचे नियम हे संरक्षण–मंडळानें हिंदुस्थानाचे पार्लमेंटपुढें ठेवून मंजूर करून घ्यावे. याविषयीं इतर कोणास सूचना मांडतां येणार नाहींत.

( ७९ ) स्वराज्यस्थापनेच्या पूर्वी जे लोक सरकारच्या वरिष्ठ नोकरींत असतील ते पुढेंहि स्वराज्याचे नोकर होतील.

( ८० ) त्यानंतर कमीजास्ती करावयाचे ते पब्लिक सर्व्हिस कमिशन नांवाचें कायमचें मंडळ नेमून त्याकरवीं करवावे.

( ८१ ) अधिकारी वर्ग कसा बनवावा ? कसा तयार करावा ? नेमणुकी कशा कराव्या ? त्याच्या नोकरीचे नियम काय असावेत ? याविषयीं स्वतः पार्लमेंटानें कायदे करून त्याअन्वये पुढें नियम करण्याचें काम गव्हर्नर–जनरल किंवा प्रांतिक सरकार याजकडे सोंपवावें.

( ८२ ) एकंदर खात्यासंबंधानें वरील सर्व व्यवस्था सुचविण्याकरितां पब्लिक सर्व्हिस कमिशन म्हणून एक कायमचें मंडळ नेमावें, व त्याला योग्य तो अधिकार द्यावा.

( ८३ ) या मंडळाचे सभासद दर पांच वर्षांनीं बदलावे. स्वराज्यस्थापनेपूर्वी नोकरींत असणाऱ्या कोणाहि नोकराला नोकरी सोडून जावेसें वाटेल, तर पहिल्या तीन वर्षांचे आंत त्याला तसें करतां येईल. आणि तसें केल्यास त्याला जुन्या नियमाप्रमाणें पेन्शन, ग्रॅच्युइटी, नुकसान भरपाई देण्यांत येईल.

( ८४ ) लष्कर, विमान, आरमार या खात्यांतील काळ्या व गोऱ्या अधिकाऱ्यांचे पगार भत्ते वगैरे संबंधानें जुने हक्क कायम राहतील; व त्या हक्कांपैकीं कांहीं काढून घेतल्यास योग्य नुकसानभरपाई गव्हर्नरजनरल यांच्या शिफारसीवरून देण्यांत येईल.

( ८५ ) हिंदुस्थानासंबंधानें तह किंवा करार यांच्यायोगानें जे हक्क ज्या जबाबदाऱ्या पूर्वी उत्पन्न झाल्या ते हक्क किंवा जबाबदाऱ्या स्वराज्यसरकारहि संभाळील. मतभेद झाल्यास नवीन वरिष्ठ कोर्ट त्याचा निकाल देईल.

( ८६ ) प्रांतरचना कोठेंहि नवी करावयाची झाल्यास ती भाषेच्या

तत्त्वावर व प्रांतांतील बहुमताला मान्य असेल तरच करावी. पण हें करतांना स्वराज्यव्यवस्था व आर्थिक शक्याशक्यता याहि गोष्टी लक्षांत घ्याव्या.

( ८७ ) स्वराज्यघटनेचें कोणतेंहि अंग अगर कलमें बदलावयाचीं झाल्यास तें करण्याचा अधिकार हिंदी पार्लमेंटाला आहे. या संबंधानें कोणताहि कायदा व्हावयाचा तर तो हिंदी पार्लमेंटाच्या दोनही सभांनीं एकत्र बसून मंजूर केला पाहिजे, व तिसऱ्या वाचनाचे वेळीं दोनही सभांच्या ⅔ इतक्या संख्येनें त्याला मान्यता दिलेली असली पाहिजे.

## अधिकारविषयांची वांटणी.

यानंतर दोन परिशिष्टांत मिळून नेहरू कमिटीनें वरिष्ठ सरकार व प्रांतिक सरकार यांच्या दरम्यानच्या कारभाराच्या विषयांची वांटणी करून मांडली आहे. उदाहरणार्थ, खालील विषय **वरिष्ठ सरकारच्या** अधिकारांत राहतील:—

( १ ) देशी व परदेशी व्यापार व व्यापारी मंडळाचे कायदे. ( २ ) कस्टम, इन्कमटॅक्स, एक्साईज, अफू वगैरे करांच्या बाबी. ( ३ ) देशी धंद्याच्या संरक्षणाकरितां द्यावयाच्या सवलती. ( ४ ) सरकारी कर्ज. ( ५ ) चालू नाणें व चलन. ( ६ ) सर्व प्रकारच्या पेढ्यांविषयींचा कायदा व कागदी चलनाची व्यवस्था. ( ७ ) बिल, चेक, हुंडी, प्रॉमिसरी नोट, वगैरेसंबंधानें कायदा. ( ८ ) जहाजें, उतारू, व्यापारी बंदरें, समुद्रमार्ग वगैरे. ( ९ ) रेल्वे व लष्करी महत्त्वाचे राजमार्ग. ( १० ) विमानासंबंधीं सर्व व्यवस्था. ( ११ ) पोस्ट, तार, टेलिफोन, बिनतारी संदेश वगैरे. ( १२ ) लष्कर, विमानें व आरमार या संबंधानें सर्व कारभार. ( १३ ) परराष्ट्रीय व हिंदी संस्थानें यांचे संबंध, परदेशीं जाणाऱ्या हिंदी नागरिकांचें संरक्षण, किंवा देशांत येणाऱ्या परदेशी लोकांचें नियंत्रण. ( १४ ) उद्योगधंद्याकरितां परदेशी जाणारे व परदेशांतून येणारे लोक. ( १५ ) क्वारटाईन, आरमारी इस्पितळें वगैरे. ( १६ ) सरकारी नौकरवर्ग. ( १७ ) हिशेबतपासणीखातें. ( १८ ) हायकोर्टें व वरिष्ठ कोर्ट. ( १९ ) दिवाणी हक्कासंबंधानें सर्व कायदे. ( २० ) फौजदारी कामासंबंधानें सर्व कायदे. ( २१ ) दिवाळखोरी. ( २२ ) लग्न, सोडचिठ्ठी, अज्ञा-

नाचें पालन करण्याचे हक्क वगैरे. ( २३ ) पुस्तकें, चित्रें, कविता, नवीन शोध, युक्तया वगैरे हक्कांचे नियम. ( २४ ) सरकारी कामाकरितां सक्तीनें जमीनखरेदी. ( २५ ) दस्तऐवजाची नोंदणी. ( २६ ) जन्ममृत्यूचीं नोंदणी. ( २७ ) खानेसुमारी व इतर आंकडेबंद माहिती. ( २८ ) हत्यारें दारूगोळा. ( २९ ) पेट्रोलियम ज्वालाग्राही पदार्थ वगैरे. ( ३० ) वजनें मापें. ( ३१ ) किनाऱ्यालगत मासे मारण्याच्या जागा. (३२) सर्व्हे खातें, भूगोल संशोधन खातें, हवामान व ज्योतिष. ( ३३ ) हिंदी पार्लमेंटाच्या निवडणुकी. ( ३४ ) राजधानीची व्यवस्था. ( ३५ ) प्रांताप्रांतांची कारवाई. ( ३६ ) कारखान्यासंबंधाचा कायदा. ( ३७ ) मजूरवर्गासंबंधीं कायदा. ( ३८ ) खाणी वगैरे. ( ३९ ) वैद्यकपरीक्षा वगैरे. ( ४० ) सरकारी कामाला लागणाऱ्या मालाची खरेदीविक्री. ( ४१ ) सरकारातर्फे मतप्रसाराचें खातें. ( ४२ ) वनस्पति, पुराणसंशोधन खातें, प्राणिरक्षण वगैरे. ( ४३ ) सर्व प्रकारचें संशोधन. ( ४४ ) मुलखांची वांटणी, प्रांतरचना वगैरे. ( ४५ ) स्वराज्याच्या मिळकतीची राखण व हिशेब. (४६) जंगलखात्याचें कायदे. ( ४७ ) स्टँपखात्याचा कायदा.

खालील बाबी **प्रांतिक सरकारच्या** कारभारांत राहतील:—

( १ ) जमीनमहसूल, इनाम सर्व्हे व सेटलमेंट खातें ( २ ) दारू खातें व मादक पदार्थ ( ३ ) स्थानिक व प्रांतिक कराचे प्रश्न ( ४ ) प्रांतिक सरकाराकरितां लागणारी जमीन सक्तीनें घेणें ( ५ ) प्रांतिक जंगलाची व्यवस्था ( ६ ) शेतकीखातें ( ७ ) प्रांतिक बंदरांतील मासेमारी ( ८ ) पाणीपुरवठा, कालवे, ड्रेनेज वगैरे ( ९ ) इमारती, रस्ते, पूल, छोट्या रेल्वे ( १० ) परस्परसहकारी खातें ( ११ ) खनिज संपत्ति ( १२ ) दुष्काळी व्यवस्था ( १३ ) यात्रेकरूंची व्यवस्था ( १४ ) स्थानिक स्वराज्य ( १५ ) वैद्यक खातें व वैद्यकशिक्षण ( १६ ) सार्वजनिक आरोग्य व त्यासंबंधानें आंकडेबंद माहिती ( १७ ) सर्वसामान्य धंदेवाईक शिक्षण ( १८ ) अज्ञानाच्या इस्टेटीचें संरक्षण ( १९ ) जमीनसुधराई व शेतकऱ्यांना देण्याचें कर्ज ( २० ) जमीनधारा व कुळें यांचे संबंध ( २१ ) सरकारी ट्रस्टची व्यवस्था ( २२ )

उद्योगवृद्धि व शोध ( २३ ) पोलीस खातें ( २४ ) लोकोपयोगी, विशेषतः अन्नाच्या पदार्थांतील भेसळ ( २५ ) उतारूंच्या वाहतुकीच्या व इतर वाहनांची व्यवस्था, व नाटकगृहें, सिनेमा वगैरेंचें नियंत्रण ( २६ ) तुरुंग-व्यवस्था ( २७ ) मागासलेले लोक व त्यांची व्यवस्था ( २८ ) भूगत द्रव्य ( २९ ) प्रांतिक न्यायखातें ( ३० ) कायदेमंडळाच्या निवडणुकी ( ३१ ) प्रांतिक कायदेमंडळाबद्दल करण्याचे नियम वगैरे ( ३२ ) प्रांतिक सरकारच्या पतीवर काढण्यांत येणारें कर्ज ( ३३ ) जन्म, मृत्यु, विवाह यासंबंधींच्या कायद्याची बजावणी ( ३४ ) प्रांतिक हायकोर्टाचे लॉ रिपोर्टस ( ३५ ) प्रांतिक बंदरें ( ३६ ) सार्वजनिक ग्रंथसंग्रह ( ३७ ) कोंडवाडे ( ३८ ) पशूंचें आरोग्य, संरक्षण व संवर्धन ( ३९ ) कारखान्यांच्या कायद्याची बजावणी ( ४० ) मजूर व पालक यांच्या तंट्याचा निकाल ( ४१ ) गॅस, विजेची बत्ती इत्यादि ( ४२ ) बॉयलर ॲक्टाची बजावणी ( ४३ ) धूर वगैरे सार्वजनिक आरोग्याला अपायकारक गोष्टी यांना निर्बंध ( ४४ ) मजूर लोकांचीं वसतिगृहें ( ४५ ) आकस्मिक मृत्यूची चौकशी करणारे अधिकारी ( ४६ ) प्रांतिक सरकारला लागणाऱ्या मालाची खरेदी–विक्री ( ४७ ) सरकारी प्रेस ( ४८ ) प्रांतिक सरकाराचे नोकर ( ४९ ) प्रांतिक सरकारची राजधानी ( ५० ) स्थानिक संस्थांच्या निवडणुकी ( ५१ ) कोर्टफी वगैरे ( ५२ ) मालाची निपज, पुरवठा व वांटणी ( ५३ ) उद्योगधंद्याची वाढ ( ५४ ) देवस्थानें, सार्वजनिक धर्मादाय ( ५५ ) जुगार व सट्टेबाजी ( ५६ ) क्रूर कृत्यांपासून जीवजंतूंचें संरक्षण ( ५७ ) स्टँप खात्याच्या कायद्याची बजावणी ( ५८ ) दस्तऐवजांचीं नोंदणी ( ५९ ) वजनें, मापें यांची व्यवस्था ( ६० ) हत्यारें, दारूगोळा, विषें, पेट्रोल व इतर ज्वालाग्राही पदार्थ यांची कायद्याप्रमाणें व्यवस्था ( ६१ ) वर्तमानपत्रें वगैरेची नोंदणी ( ६२) धंदेवाईक लोकांची परीक्षा व पात्रता ( ६३ ) लोकल फंडाची हिशेबतपासणी.

---

# परिशिष्ट २

## जुन्या हिंदु समाजांतील राजधर्म व प्रजाधर्म

प्रस्तुत पुस्तकांत राज्य संस्थांविषयीं निरनिराळ्या अंगांनीं विवेचन केलें आहे; व तें करितांना, अवश्य तेथें, हिंदुस्थानांतील राज्य संस्थांचा उल्लेख मधून मधून केला आहे. तथापि, हिंदुस्थानांतील राज्य-संस्था व समाज रचना, आणि इतर देशांतील राज्य संस्था व समाज रचना, यांच्यामध्यें कांहीं कांहीं बाबतींत फरक आहे. म्हणून या परिशिष्टांत जुन्या हिंदु लोकांच्या राजकीय कल्पना व संस्था यांच्या इतिहासाचें अगदीं थोडक्यांत दिग्दर्शन करण्याचें योजिलें आहे.

ऋग्वेदामध्यें राज्यशास्त्राला उपयोगी पडतील असे उल्लेख फारसे नाहींत. त्यांत 'राजा' हा शब्द आलेला असून, त्या काळीं लोकांना राजसंस्थेची कल्पना चांगली होती एवढें मात्र खास दिसतें. ऋग्वेदाच्या सातव्या मंडळांत 'दाशराज्ञा'संबंधानें बरींच सूक्तें आहेत. या युद्धांत सुदासाविरुद्ध दहा राजे एकत्र होऊन लढत होते असा उल्लेख आहे. आतां 'राजा' या शब्दाच्या उल्लेखानें तो गृहपति किंवा कुलपति किंवा गोत्रपति किंवा राष्ट्रपति किंवा तत्कालीन राजांचा राजा (सम्राट) यांपैकीं कोण कोणत्या अर्थी तो शब्द प्रचारांत होता हें नक्की समजण्याला मार्ग नाहीं. तथापि राज्यसंस्थेचीं बीजें व राजाच्या कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य, म्हणजे आपल्या प्रजेकरितां युद्ध करणें, याचा उल्लेख ऋग्वेदाच्या सातव्या मंडळांत आढळतो. याहून अधिक विस्तृत व मुद्याचा उल्लेख दहाव्या मंडळांत आढळतो. १७३ वें सूक्त अशा अर्थाचें आहे. "हें राजा! तुला आम्ही उदयाला आणलें आहे. तूं आमचा राजा हो. तूं नित्य व स्थिर रहा. सर्व लोक राजा म्हणून तुझी इच्छा करोत. तुझ्या हातून राज्य नष्ट होऊं नये. तूं पर्वतासारखा स्थिर रहा. इंद्राप्रमाणें स्थिर रहा व राष्ट्राचें रक्षण कर. अभिषेक केलेल्या राजाला या निश्चित हविर्द्रव्यानें इंद्र स्थिर करो. त्याला सोम व ब्रह्मणःपति आपला असें म्हणोत. आकाश, पृथ्वी व हें सर्व जग ज्याप्रमाणें अचल आहे त्याप्रमाणें लोकांचा हा राजा कायम टिको. राजा!

वरुण, बृहस्पति, देव, इंद्र व अग्नि तुला राज्यावर स्थिर करोत व तुझें राष्ट्र स्थिर करोत. निश्चित हविर्द्रव्यानें आम्ही कायमचा सोम उत्पन्न करूं व तुलाहि कर देणाऱ्या अशा प्रजा इंद्र निर्माण करो." पुढें १७४ व्या सूक्ताचें तात्पर्य असें आहे–"देवांकडे ज्या हविर्द्रव्यानें इंद्र येतो त्यानें आम्हांला राष्ट्राकरितां तयार कर. हे राजा! देव सविता राष्ट्र प्राप्त करून देवो. कीं, ज्याच्यायोगें तूं सर्व सत्ताधारी होशील. जसा मी हविर्द्रव्यामुळें शत्रुरहित झालों, सर्व प्राण्यांचा व लोकांचा धनी झालों तसाच निःशत्रूहि झालों आहे. राष्ट्रयुक्त होत्साता व शत्रु पराभव करणारा झालों आहे."

अथर्व वेदांत राज्य संस्थेसंबंधानें पुष्कळ उल्लेख आढळतात. या वेदांतील उल्लेख हे राज्यसंस्था अस्तित्त्वांत असलेली समाजस्थिति आणि त्याचप्रमाणें ती संस्था अंमलांत येण्यापूर्वीची समाजस्थिति ही दोन्ही दर्शवितात. राज्यसंस्था होण्यापूर्वी अराजकता होती व ती लोकांना अप्रिय होती, भीतिप्रद होती, असें अथर्व वेद सांगतो. "प्रारंभी हे सर्व जनपद विराज होतें. तें पाहून सर्व भयभीत झाले आणि आतां सर्वत्र असेंच होईल कीं काय अशी त्यांना भीति वाटली. ज्ञानी ऋषींनीं जगविण्याची इच्छा धरून तप केलें; त्यांतून बल, ओज आणि राष्ट्र यांची उत्पति झाली."

पुढें महाभारतामध्यें जी अराजकतेची समाजस्थिति दर्शविली आहे ती वेदकालापूर्वीची असूं शकेल. पण अथर्व वेदकालीं समाज या अराजकतेच्या भयाण स्थितींतून निघून राज्यसंस्थेपर्यंत येऊन पोहोचला होता, इतकेंच नव्हे, तर राजपद हें लोकनियुक्त असण्याच्या कल्पनेपर्यंत ती स्थिति येऊन पोहोचली होती असें दिसतें. अराजकतेपुढें विराजकता आली, म्हणजे, तींत फक्त राजा नव्हता, पण समाज सुस्थित होता. या विराजकतेंतून सभा निर्माण झाली म्हणजे लोकसभा. त्या सभेची पुढें समिति झाली. त्या समितींत लोकांना निमंत्रण करून बोलावीत असत. कदाचित् ही प्राथमिक ग्रामसभाच असेल. या समिति शब्दाचें भाषांतर कित्येक इंग्रज ग्रंथकारांनीं Meeting Assembly किंवा 'कॉंग्रेस' असें केलें आहे. पण या समीतिपेक्षांहि मोठी अशी एक राष्ट्रीय महासभा असे. राष्ट्र म्हणजे ज्या अर्थी ग्राम किंवा गांव असाच अर्थ घेतां येत नाहीं, त्याअर्थी ही सभा ग्रामपंचायतीपेक्षां अधिक महत्त्वा-

चीहि असावी. ती कदाचित् फार थोड्या वेळां भरत असेल, पण राजाची निवड करून त्याला गादीवर बसविणें, व अयोग्य राजाला गादीवरून काढून टाकणें, वगैरे कामांचा या महासभेशीं संबंध दिसतो. ‘ संस्था ’ हा शब्द अथर्ववेदांत आढळतो. आणि त्याचा अर्थ ‘ घटना ’ अगर ‘ कॉन्स्टिटयू-शन ’ असा करतां येईल. राजांना निवडून देणारे लोक ते ‘ राजकर्ते ’ होत. आणि राजा जर लोकांनीं करावयाचा तर तो वंशपरंपरेचा नसावा असें दिसतें. “ प्रजा हाच राजाचा आश्रय आहे. देवांनीं राजाचें घर प्रजे-मध्येंच ठेविलेलें आहे. हे राजा! राज्यकारभार चालविण्यासाठीं या पांचहि दिशांतील प्रजा तुझीच इच्छा करोत आणि तुलाच निवडून देवोत. हें तुझें राजपद नष्ट न होवो ” वगैरे उल्लेख अगदीं स्पष्ट आहेत. उपनिषदांतील “ राजा हेंच राष्ट्राचें सौंदर्य आहे, राजा हीच राष्ट्राची शोभा आहे ” असें उल्लेखहि अथर्ववेदांत आढळतात.

महाभारताच्या आधीं रामायण झालें या दृष्टीनें प्रथम रामायणकालीं राजकीय कल्पना काय होती हें पाहूं. तसें पाहातां हें आढळतें कीं, अथर्ववेदा-मध्यें राजांना लोकांनीं निवडण्याची जी कल्पना व पद्धत तीच रामायण-कालींहि होती. वाल्मिकीरामायणांत अयोध्याकांडाच्या तिसऱ्या सर्गांत श्री. रामचंद्राला ‘युवराज’ नेमण्याचा प्रसंग आहे. या गोष्टीचा विचार करण्या-करितां दशरथानें सभा भरविली. सभेला लोकसंमत असे राजे जानपद इत्यादि आले होते. त्यांना दशरथानें सल्ला विचारला. तेव्हां त्यांनीं रामाला युवराज नेमण्याबद्दल संमति दिली. तेव्हां दशरथ म्हणाला, “ विचार करूनच संमति द्या. कारण मी म्हातारा म्हणून तुम्हांला त्रासदायक नाहीं. पण माझ्या जागीं तरुण तरतरीत युवराज येऊन त्यानें राजदंड हातीं घेतला तर कसें होईल ! ” त्यावर लोकांनीं उत्तर दिलें कीं, “ महाराज, राम हा तुमचा वडील मुलगा आहे एवढ्याच कारणानें आम्ही त्याला युवराज नेमण्याविषयीं संमति देत आहों असें नाहीं. तर त्याच्या अंगीं तसेच विशेष गुण आहेत. ” यानंतर दुसराहि एक असाच प्रसंग घडला.रामाच्या विरहानें दशरथ मृत्यु पावला. रामाहून धाकटा भाऊ लक्ष्मण तोहि वनांत गेला. भरत आपल्या आजोळीं होता. मिळून गादीवर राजा नाहीं अशी स्थिति प्राप्त झाली. अराजक समाजस्थितिविषयीं समाजाच्या ठिकाणीं भीति

